**महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास एप्रिल, २०१९ ते सप्टेंबर, २०१९ या कालावधीतील प्रवासी कराती रु.१९३,०३,४३,८०३/- एवढी रक्कम भांडवली अंशदान म्हणून पुस्तकी समायोजित करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
## शासन निर्णय क्र. एसटीसी- १११९/प्र.क्र.२८२ /परि-१

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २४ जानेवारी, २०२०.

**वाचा :-**

१) शासन निर्णय क्रमांकः एसटीसी ३४००/६३१/सीआर-३१/परि १, दिनांक २० जुन, २०००.
२) शासन निर्णय क्रमांक : एसटीसी-०८१४/प्र.क्र.४७८/परि-१, दिनांक ४ जुलै, २०१५. व शुध्दीपत्रक दि.०८ सप्टेंबर, २०१५.
३) वित्तिय सल्लागार व मुख्य लेखाधिकारी, म.रा.मा.प. महामंडळ यांचे पत्र क्र.राप/लेखा/ अंववि/२०२/२६९५, दि.०६.११.२०१९ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळावर १७.५ टक्के या दराने प्रवासी कर आकारण्यात येतो. संदर्भाधिन क्र.१ येथील दि.२०.६.२००० च्या शासन निर्णयान्वये सदर प्रवासी करातील १२ टक्के प्रमाणे येणारी रक्कम शासनास अदा करावी व उर्वरित ५.५ टक्के दराने येणारी रक्कम भांडवली अंशदानाच्या स्वरुपात महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास उपलब्ध करुन देण्यात यावी, असा धोरणात्मक निर्णय घेण्यात आला होता. तद्‌नंतर संदर्भाधिन क्र.२ येथील दि.०४.०७.२०१५ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास देण्यात येणारे भांडवली अंशदान ५.५ टक्के यावरुन १० टक्के एवढे वाढविण्याबाबत धोरणात्मक निर्णय घेण्यात आला आहे. सन २०१९-२० या आर्थिक वर्षातील एप्रिल, २०१९ ते सप्टेंबर, २०१९ या कालावधीतील रु.१७.५ टक्के दराने ग्रामीण सेवेवरील प्रवासी कराची रक्कम रु.४७७,८१,०१,६५३/- असून त्यापैकी १० टक्के दराने परिगणीत केलेली प्रवासी कराची रक्कम रु.२७३,०३,४३,८०३/- एवढ्या प्रवासी कराचे भांडवली अंशदान म्हणून पुस्तकी समायोजन

करण्याबाबत संदर्भाधिन क्र.३ येथील दि.०६.११.२०१९ च्या पत्रान्वये महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाने शासनास प्रस्ताव सादर केला आहे.

**परंतु, समायोजित करावयाच्या रु.२७३,०३,४३,८०३/- रकमेपैकी रु.१९३,०३,४३,८०३/- इतक्या रकमेस वित्त विभागाची मान्यता प्राप्त झाल्याने, त्यानुसार रु.१९३,०३,४३,८०३/- इतक्या रकमेच्या पुस्तकी समायोजन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.**

**शासन निर्णय**:-

सन २०१९-२० या अर्थसंकल्पिय वर्षातील एप्रिल, २०१९ ते सप्टेंबर, २०१९ या कालावधीतील १०% दराप्रमाणे रु.१९३,०३,४३,८०३/- (अक्षरी रु.एकशे त्र्यान्नव कोटी तीन लाख त्रेचाळीस हजार आठशे तीन फक्त) एवढी प्रवासी कराची रक्कम शासनाचे भांडवली अंशदान म्हणून महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास पुस्तकी समायोजनाद्वारे उपलब्ध करुन देण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर रक्कम गृह विभाग, “मागणी क्र. बी-१०, ५०५५- मार्ग परिवहन यावरील भांडवली खर्च ००, १९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका (००) (००) (०१) महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाला भागभांडवली अंशदान, (अनिवार्य) (५०५५ ००११)” ३२, अंशदाने या लेखाशिर्षाखाली पुस्तकी समायोजनाने खर्च दाखविण्यात यावी व लेखाशिर्ष “००४२ मालावरील व उतारुवरील कर -१०६- कर वसुली (००४२ ००६२) (०१) (०२) उतारुवरील करापासून मिळालेल्या जमा रक्कमा” या खाली पुस्तकी समायोजनाने प्रवासी कराची रक्कम जमा दाखविण्यात यावी. सदर पुस्तकी समायोजन सन २०१९-२० या वर्षाच्या अर्थसंकल्पिय तरतुदीतून करण्यात यावे.

३. वरीलप्रमाणे कार्यवाही करण्यास परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत असून त्यांच्या कार्यालयातील आहरण व संवितरण अधिकारी असलेले लेखाधिकारी यांनी सदर रक्कमेचे पुस्तकी समायोजन करण्याची कार्यवाही करावी.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.३९९/२०१९/व्यय८, दि.२८.११.२०१९ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००१२४१८१७२२५५२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Meghana Gaurav Shinde

Digitally signed by Meghana Gaurav Shinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Deaprtment, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d29224e30812c4523eedb32c54f5cbc27548f81ccf656192b6d735115af1dfb8, cn=Meghana Gaurav Shinde
Date: 2020.01.27 15:17:34 +05'30'

**( मेघना गौरव शिंदे )**
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१.परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२.उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई
३.महाव्यवस्थापक (वाहतूक), महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई.
४.वित्तीय सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ,मुंबई.
५.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
६.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
७.महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
८.महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
९.महालेखापाल (वाणिज्यिक लेखा परिक्षा), मुंबई.
१०.संचालक, लेखा व कोषागारे, संगणक शाखा, मुंबई.
११.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१२.वित्त विभाग (व्यय-८/अर्थसंकल्प-११/साऊ), मंत्रालय, मुंबई.
१३. गृह विभाग, बीयुडी-१, मंत्रालय, मुंबई.
१४. निवड नस्ती/कार्यासन परि-१.